# अभिधानसंग्रह ।

प्राचीन संस्कृत ग्रन्थांचा जीर्णोद्धार करण्याचें काम सांप्रत चोहोंकडे मोठ्या सपाट्यानें चालू झालें आहे, ही मोठ्या आनन्दाची गोष्ट होय। तथापि त्या ग्रन्थांतील ज्ञानाच्या प्राप्तीला उत्तम साधन असे जे प्राचीन शब्दकोश, त्यांकडे जितकें लक्ष लागावें, तितकें अद्यापि लागलें नाहीं। हे कोश पद्यरूप असल्यामुळें, मुखोद्गत करण्याला फार सोईवार असून, पाहिजेल तेव्हां स्फूर्ति उत्पन्न करण्याला फार चांगले असतात। तेव्हां अशा ग्रन्थांचा संग्रह करणें हें, संस्कृताभिमानी प्रत्येक गृहस्थाचें कर्तव्य होय। लोकवार्तेवरून हे कोश छप्पन्न आहेत असें समजतें। तथापि त्यांतील बरेच सांप्रत नामशेष झाले आहेत। यास्तव, सध्यां जे उपलब्ध आहेत त्यांच्या उद्धाराकडे जर कोणाचें लक्ष लौकर न पोंचलें, तर तेही नष्ट होऊन जाण्याचा फार संभव आहे हें जाणून, आह्मी मोठ्या प्रयत्नानें त्यांतील बहुतेक कोशांचा संग्रह केला आहे, आणि राहिलेल्या इतर कोशांच्या प्राप्त्यर्थ यत्न चालविला आहे। तथापि त्या सर्वांची वाट पहात न राहतां, सांप्रत जितके उपलब्ध आहेत, तितकेच आधीं सर्वांच्या उपयोगास्तव छापून प्रसिद्ध करावे, आणि तोच क्रम पुढें चालू ठेवावा, असा निश्चय केला आहे। एककालीं एकाच पुस्तकामध्यें हे छापिल्यास, काळ फार लागेल, ग्रन्थही अवजड होईल, आणि तदनुरूप किंमतही भारी होईल। म्हणून ग्राहकांच्या सोईकरितां असा बेत केला आहे कीं, जो कोश हातीं घ्यायाचा, तो एका खेपेस पुरा करायाचा; अपूर्ता ठेवायाचा नाहीं। ग्रन्थ लहान असल्यास, दोन, तीन, किंवा अधिक पुरे ग्रन्थ घेऊन त्यांचें एक पुस्तक करायाचें। पुस्तकें चांगल्या कागदावर सुरेख छापिलीं जातील। जसजसे ग्रन्थ तयार होत जातील तसतशी त्यांविषयीं वेळच्यावेळीं सूचना देण्यांत येईल। प्रत्येक कोशाच्या पृष्ठांचा क्रम वेगवेगळा येईल।

या नियमाला अनुसरून याचें प्रथम आणि द्वितीय खण्ड छापून तयार झालें आहे। प्रथम खण्डांत अमरसिंहकृत 'नामलिङ्गानुशासन (अमरकोश)', आणि त्याचेंच परिशिष्ट पुरुषोत्तमदेवकृत 'त्रिकाण्डशेष', आणि 'हारावली', 'एकाक्षरकोश' आणि 'द्विरूपकोश' हे पांच कोश संपूर्ण आले आहेत। किंमत १ रुपया। टपालखर्च २ आणे।

द्वितीय खण्डामध्यें हेमचन्द्रकृत 'अभिधानचिन्तामणि', 'अभिधानचिन्तामणिपरिशिष्ट', 'अनेकार्थसंग्रह', 'निघण्टुशेष' आणि 'लिङ्गानुशासन' हे पांच कोश आणि जिनदेवमुनीश्वरविरचित 'अभिधानचिन्तामणिशिलोञ्छ' हा एक कोश इतके आले आहेत। किंमत १। रुपया। टपालखर्च ३ आणे।

तृतीय खण्डामध्यें महेश्वरकृत 'विश्वप्रकाश' आणि 'शब्दभेदप्रकाश' हे दोन कोश यावयाचे आहेत।

ज्या कोणांस हीं पुस्तकें घ्यावयाचीं असतील त्यांहीं आपलीं नांवें आणि वर्गणी आमचेकडेस पाठवावीं, ह्मणजे पुस्तकें तयार होतांच त्यांजकडे पाठविण्यास ठीक पडेल।

**तुकाराम जावजी।**

'निर्णयसागर' छापखान्याचे मालक।

---

१. दुसरीकडे दिलेल्या यादीवरून हे कोश छप्पन्नांपेक्षांही अधिक आहेत असें दिसून येईल।

